**विशेष लेखा परीक्षक वर्ग-२, सहकारी संस्था, गट-ब या संवर्गातून लेखापरीक्षक श्रेणी-१ या संवर्गात पदावनत करण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सहक-१२१३/प्र.क्र.३११/१२-स**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २४ एप्रिल, २०१५

<u>वाचा:</u>- १) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/कक्ष-१/लेपश्रे-१/पदोन्नती प्रस्ताव/२००९, दि.११.०८.२००९

२) स.प.व व.वि., शासन निर्णय क्र.राजस-१२०९/प्र.क्र.१४१/१२-स, दि.०८.०६.२०१०

३) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे दि.१९.१२.२०१२ चे आदेश

४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/कक्ष-१/वै(एम.एस.एल व इतर )/पदो/१९९/१५, दि.१०.०३.२०१५ व दि.१६.०३.२०१५ चे पत्र.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सहकार आयुक्त कार्यालयाच्या दि.११/८/२००९ च्या पत्रानुसार लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात दि.०१/०१/२००७ च्या राज्यस्तरीय सेवा ज्येष्ठता यादीनुसार पदोन्नती देण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला. त्यानुसार शासन निर्णय क्र राजस-१२०९ /प्र.क्र.१४१/१२-स, दि.८/६/२०१० अन्वये लेखापरीक्षक श्रेणी १ (वर्ग-३) मधून विशेष लेखापरीक्षक वर्ग-२ मध्ये ४५ अधिका-यांना सरळसेवेच्या कोटयातून तदर्थ पदोन्नती देण्यात आली. तथापि, सदरच्या शासन निर्णयामध्ये श्री.मनोज सुर्यकांत लाखे, लेखापरिक्षक श्रेणी-१ यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यात आली. मात्र श्री. लाखे यांना पदोन्नती न मिळाल्याने सदर आदेशाविरुध्द त्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दि. १/४/२०१२ रोजी मूळ अर्ज क्रमांक ३२८/२०१२ दाखल केला. मा. न्यायाधिकरणाने सदर अर्जाच्या सुनावणीमध्ये प्रस्तुत प्रकरणी खाते परीक्षा संदर्भातील शासन परिपत्रक दि.१६/१२/१९८३ नुसार सुधारित सेवाज्येष्ठता यादी मध्ये श्री.लाखे यांना दि.१/१/२००५ च्या सेवाज्येष्ठता यादीमध्ये स्थानांक मिळाल्यामुळे श्री.लाखे यांच्या नावाचा समावेश दि.१/१/२००७ चे सुधारित राज्यस्तरीय सेवाज्येष्ठता यादीमध्ये झाला असता, हा अर्जदार श्री.लाखे यांचा मुद्दा मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मान्य करुन " सदर

प्रकरणी सुधारित सेवाज्येष्ठता यादी तयार करुन त्यानुसार श्री.लाखे व इतर पात्र कर्मचाऱ्यांना मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी दिलेल्या निर्णयापासून चार महिन्याच्या आंत पदोन्नती द्यावी" असे आदेश दिनांक १९/१२/२०१२ रोजी दिलेले आहेत. परंतु मा.न्यायाधिकरणाच्या आदेशाप्रमाणे श्री. लाखे व इतर यांना पदोन्नती देणे शक्य झाले नसल्याने, श्री.लाखे यांनी दि. २२/४/२०१३ रोजी अवमान याचिका क्रमांक ३२/२०१३ दाखल केली आहे. सदरहू अवमान याचिकेमध्ये दि.४.३.२०१५ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये मा.प्रशासकीय न्यायाधिकरणे दि.१९/१२/२०१२ च्या न्यायानिर्णयानुसार दि.१७/०३/२०१५ पर्यन्त अंतिम आदेश पारित करण्याबाबत आदेशीत केले.

सन २००७ च्या सेवा ज्येष्ठतायादीनुसार दि.८/६/२०१० चे आदेश पारित करताना, श्री.लाखे व इतर यांना सेवा ज्येष्ठतेनुसार कनिष्ठ असलेल्या लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गातील काही कर्मचाऱ्यांना पदोन्नती दिली असल्याची बाब, सन २००९ ची अंतिम सेवाज्येष्ठता यादी प्रसिध्द झाल्यानंतर निदर्शनास आली. त्यामुळे मा. न्यायाधिकरणाच्या उपरोक्त आदेशानुसार श्री. लाखे व इतर यांना तदर्थ पदोन्नती देणे क्रमप्राप्त ठरते. सन २००७ च्या सेवा ज्येष्ठतायादीनुसार लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गातून एकूण ५२ कर्मचाऱ्यांना विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात पदोन्नती देण्यात आली आहे. त्यामुळे दि.०१.०१.२००९ ची अंतिम सेवा जेष्ठता यादी विचारात घेवून त्यानुसार श्री.लाखे यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांसह लेखापरीक्षक श्रेणी-१ या सवंर्गातील ५२ कर्मचाऱ्यांची निवडसूची तयार करण्यात येवून, जे सेवा कनिष्ठ कर्मचारी तदर्थ पदोन्नतीने विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात कार्यरत आहेत अशा अधिकाऱ्यांना पदावनत करुन सेवा वरिष्ठ असलेले परंतू पदोन्नत न झालेले श्री. लाखे व इतर १० अशा एकूण ११ कर्मचाऱ्यांपैकी ५ कर्मचाऱ्यांना तदर्थ पदोन्नती देण्याच्या दृष्टीकोनातून २ तदर्थ पदोन्नत सेवाजेष्ठ अधिकाऱ्यांना नियमित कोटयात पदोन्नती, ३ तदर्थ अधिकाऱ्यांची पदावनती करण्याचे निश्चित करण्यात आले. त्यानुसार सुधारित ५२ कर्मचाऱ्यांच्या निवडसूची नुसार, विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात तदर्थ पदोन्नती देण्यात आलेल्या श्री.डी.एस.गायकवाड (से.ज्ये.क्र.६७), श्री. ए. व्ही. संख्ये (से.ज्ये.क्र ७८) व श्री.एस.एस.भंडारे (से.ज्ये.क्र. २२६) हे सेवा कनिष्ठ असल्याने या ३ अधिकाऱ्यांना लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गात पदावनत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सहकार आयुक्त कार्यालयाच्या दि.११/८/२००९ च्या पत्रानुसार लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात दि.०१/०१/२००७ च्या राज्यस्तरीय सेवा ज्येष्ठता यादीनुसार पदोन्नती देण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला. त्यानुसार शासन निर्णय क्र राजस-१२०९ /प्र.क्र.१४१/१२-स, दि.८/६/२०१० अन्वये लेखापरीक्षक श्रेणी १ (वर्ग-३) मधून विशेष लेखापरीक्षक वर्ग-२ मध्ये ४५ अधिका-यांना सरळसेवेच्या कोटयातून तदर्थ पदोन्नती देण्यात आली. सदरचे आदेश निर्गमित करताना सरळसेवेच्या कोटयातील पदांवर लेखापरीक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, गट-ब (वर्ग-२) या पदावरील पदोन्नती संपूर्णपणे तदर्थ स्वरुपात देण्यात येत असून लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेने विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, गट-ब (वर्ग-२) या संवर्गातील अधिकारी शासनास उपलब्ध होईपर्यन्त अथवा पदोन्नती आदेशाच्या दिनांकापासून ११ महिन्यांपर्यन्तच यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त या पदोन्नत्या चालू राहतील. सरळसेवेच्या कोटयातील पदावर पदोन्नत अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे कोणतेही अधिकार राहणार नाहीत. याप्रमाणे हे अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यापूर्वी संबंधीत अधिकाऱ्याकडून त्यांना तात्पुरत्या नियमित पदोन्नतीचा हक्क राहणार नसल्याचे लेखी बंध पत्र सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेवून तद्नंतर रितसर कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात यावेत, असे नमूद केले आहे. त्यानुसार खालील ३ तदर्थ अधिकाऱ्यांकडून लेखी बंध पत्र सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेतलेले आहे.

२. दि.८.६.२०१० च्या शासन निर्णयामध्ये श्री.मनोज सुर्यकांत लाखे, लेखापरिक्षक श्रेणी-१ यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यात आली. मात्र श्री. लाखे यांना पदोन्नती न मिळाल्याने त्यांनी सदर आदेशाविरुध्द त्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दि. १/४/२०१२ रोजी मूळ अर्ज क्रमांक ३२८/२०१२ दाखल केला. मा. न्यायाधिकरणाने दिनांक १९/१२/२०१२ रोजी पारित केलेल्या आदेशाची अंमलबजावणी न झाल्याने श्री.लाखे यांनी अवमान याचिका क्रमांक ३२/२०१३ दाखल केली आहे. सदरहू अवमान याचिकेमध्ये झालेल्या सुनावणीमध्ये मा.प्रशासकीय न्यायाधिकरणे दि.१९/१२/२०१२ च्या न्यायानिर्णयानुसार दि.१७/०३/२०१५ पर्यन्त अंतिम आदेश पारित करण्याबाबत आदेशीत केले. त्यानुसार प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार सन २००९ च्या अंतिम सेवाज्येष्ठतेनुसार श्री.लाखे यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांसह लेखापरीक्षक श्रेणी-१ या

सवंर्गातील ५२ कर्मचाऱ्यांची सुधारित निवडसूची तयार करण्यात येवून, जे सेवा कनिष्ठ कर्मचारी तदर्थ पदोन्नतीने विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात कार्यरत आहेत अशा अधिकाऱ्यांना पदावनत करुन सेवा वरिष्ठ असलेले परंतू पदोन्नत न झालेले श्री. लाखे व इतर ४ कर्मचाऱ्यांना तदर्थ पदोन्नती देण्याच्या दृष्टीकोनातून सुधारित ५२ कर्मचाऱ्यांच्या निवडसूची नुसार, विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात तदर्थ पदोन्नती देण्यात आलेल्या श्री.डी.एस.गायकवाड (से.ज्ये.क्र.६७), श्री. ए. व्ही. संख्ये (से.ज्ये.क्र ७८) व श्री.एस.एस.भंडारे (से.ज्ये.क्र. २२६) हे सेवा कनिष्ठ असल्याने या ३ अधिकाऱ्यांना विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गातून लेखापरिक्षक श्रेणी-१ (वर्ग-३) या संवर्गात पदावनत करण्यात येत आहे.

३. वरील पदावनतीच्या अनुषंगाने श्री.डी.एस.गायकवाड, , श्री. ए. व्ही. संख्ये, व श्री.एस.एस.भंडारे हे लेखापरिक्षक श्रेणी-१ (वर्ग-३) या पदावरील पदस्थापनेचे सविस्तर आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही व त्या अनुषंगाने वेतन निश्चिती बाबत नियमानुसार पुढील उचित कार्यवाही सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी. तसेच सदर कर्मचारी तात्काळ पदस्थापनेच्या जागी रुजु होतील याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर आदेश सामान्य प्रशासन विभाग यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ८१/१६ब, दि.२६/३/२०१५ व सामान्य प्रशासन विभाग यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५९५/१२, दि. ७/४/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४१६५९३८२४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.04.24 17:10:44 +05'30'

**( सु.मु.धाडवे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३. संचालक,वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य,नागपूर,

४. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (प्रशासन व लेखा परीक्षण)

६. सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था,

७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)

८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

११.सर्व संबंधित अधिकारी, द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे

१२.खाजगी सचिव मा.मंत्री (सहकार/पणन/वस्त्रोद्याग), मा.राज्यमंत्री (सहकार/पणन/वस्त्रोद्योग)

१३.प्रधान सचिव (सहकार) / प्रधान सचिव (वस्त्रोद्योग ) यांचे स्वीय सहायक,

१४.कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (१६-ब, १२), मंत्रालय, मुंबई-३२

१५.निवड नस्ती १२-स